**राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्या सेवा**
**<u>शर्तीमध्ये सुधारणा करणेबाबत</u>**

महाराष्ट्र शासन,
सामान्य प्रशासन विभाग,
शासन निर्णय क्रमांक - रामाआ २०१०/५३९/प्र.क्र.२३९/१०/सहा,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ०८/०२/२०११.

**वाचा -** (१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्रमांक - एसआयसी-२००६/१३२२/ सीआर ०४/०७/५, दिनांक ७/९/२००७.
(२) केंद्रीय माहिती आयोगाचे क्रमांक १६/२/२००६/सीआयसी- ॲडमीन, दिनांक २९/१/२००९ चे आदेश.

**<u>प्रास्ताविक :-</u>**

माहितीचा अधिकार अधिनियम २००५ च्या कलम १६ (५) मधील तरतुदीनुसार राज्य मुख्य माहिती आयुक्त यांचे वेतन व भत्ते तसेच सेवेच्या इतर अटी व शर्ती, भारताचे निवडणुक आयुक्त यांच्या समकक्ष असतील असे निर्देशित करण्यात आले आहे. त्यानुसार उपरनिर्दिष्ट क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये राज्य मुख्य माहिती आयुक्तांच्या सेवेच्या अटी व शर्ती विहीत करण्यात आलेल्या आहेत. केंद्र शासनाने High Court & Supreme Court Judges (Salaries & Conditions of Service) Amendment Ordinance, 2009 अन्वये केलेल्या सुधारणा विचारात घेऊन भारताच्या निवडणुक आयुक्तांच्या सेवेच्या अटी व शर्तीमध्येही त्यानुसार सुधारणा करण्यात आल्या आहेत. भारताच्या निवडणुक आयुक्तांच्या सेवेच्या अटी व शर्तीमध्ये केलेल्या सुधारणांप्रमाणे राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्याबाबतीत सेवा निवृत्ती विषयक लाभ व घरभाडे भत्त्यात सुधारणा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती त्याबाबत शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**<u>निर्णय</u> -**

राज्य मुख्य माहिती आयुक्त यांच्याबाबतीत सेवा निवृत्तीवेतन विषयक लाभ व घरभाडे भत्त्यात

खालील प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत:-

| **बाब** | **असुधारित वेतन व भत्ते** | **सुधारित वेतन व भत्ते** | **सुधारणा अंमलात आल्याचा दिनांक** |
|---|---|---|---|
| अतिरिक्त निवृत्ती वेतन | सेवेच्या प्रत्येक पूर्ण वर्ष कालावधीसाठी रु.७८००/- | सेवेच्या प्रत्येक पूर्ण वर्ष कालावधीसाठी रु.१६,०२०/- | ०१.०१.२००६ |
| निवृत्ती वेतन व अतिरिक्त निवृत्ती वेतनाची एकूण कमाल मर्यादा | रु.२,७०,०००/- प्रतिवर्ष | रु.५,४०,०००/- प्रतिवर्ष | ०१.०१.२००६ |
| शासकीय निवासस्थानाऐवजी देय असलेला घरभाडे भत्ता | वेतन + महागाई वेतनाच्या ३० टक्के | वेतनाच्या ३० टक्के | ०१.०९.२००८ |

वरील शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक १९१/२०१०/१०/सेवा-४, दिनांक २१/०९/२०१० अन्वये प्राप्त सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर संगणक सांकेतांक क्रमांक २०११०२०९१५४३५९००१ वर प्रसिध्द करण्यात आलेला आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**( रा. शि. अरवारी )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

मा.राज्यपाल यांचे सचिव.
मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
मा.राज्य मुख्य माहिती आयुक्त, महाराष्ट्र राज्य.
मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
सर्व राज्य माहिती आयुक्त.
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१ महाराष्ट्र,मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा)-१ महाराष्ट्र मुंबई.
सचिव, राज्य माहिती आयोग, १३ वा मजला, नवीन प्रशासन भवन,मुंबई - ४०० ०३२
अधिदान लेखा अधिकारी,मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
**निवड नस्ती, कार्या. सहा.**